भा.व.से. अधिकाऱ्यांनी वार्षिक कृती आराखडा
(Annual Work Plan) सादर करणेबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-संकिर्ण-२०१५/प्र.क्र.११६/फ-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक-०३ जून,२०१५

**परिपत्रक :-**

अखिल भारतीय सेवा (कार्यमूल्यांकन अहवाल) नियम, २००७ मध्ये अखिल भारतीय सेवेतील अधिका-यांनी संपूर्ण वर्षात करावयाच्या महत्वपूर्ण कामाबाबतचा वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) तयार करावा असे निर्देश दिले आहेत. सदर निर्देशांच्या अनुषंगाने महाराष्ट्र संवर्गातील भारतीय वन सेवेतील अधिका-यांनी वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) तयार करण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.सबब आता त्यानूषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. भारतीय वन सेवेतील सर्व अधिका-यांनी प्रतिवेदन (Reporting Officer) अधिका-याचा सहमतीने वर्षभरात करावयाच्या महत्वपूर्ण कामाबाबतचा वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) तयार करावा.
२. सदर वर्षात करावयाची महत्वाची कामे, त्याकरीता उपलब्ध आर्थिक तरतूद, शासनाने ठरवून दिलेला KRA इ. बाबींचा सर्वंकष विचार करून वार्षिक कृती आराखडा तयार करण्यात यावा.
३. प्रत्येक वर्षाच्या सुरूवातीस वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) तयार करण्याची कार्यवाही सुरू करावी व कोणत्याही परिस्थितीत त्या वर्षाच्या ३० एप्रिलपर्यंत तो अंतिम करण्यात यावा.
४. ज्या अधिका-यांनी या वर्षासाठीचा (सन २०१५-२०१६) वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) अदयापर्यंत अंतिम केलेला नाही, त्यांनी तो दिनांक १५ जून, २०१५ पर्यंत अंतिम करावा.
५. काही प्रकरणी बदलीने नवीन प्रतिवेदन अधिकारी येण्याची शक्यता आहे. अशा प्रकरणी पूर्वीच्या प्रतिवेदन अधिका-याने अंतिम केलेला वार्षिक कृती आराखडा (Annual Work Plan) कायम ठेवण्यात यावा.
६. काही प्रकरणी वार्षिक कृती आराखडा अंतिम झाल्यानंतर संबधित अधिका-याची त्या पदावरून अन्यत्र बदली होण्याची शक्यता आहे. अशा प्रकरणी देखील या पूर्वी त्या पदाकरीता अंतिम करण्यात आलेला वार्षिक कृती आराखडा कायम राहील. तसेच संबधित अधिका-याच्या कालावधीत सदर कृती आराखडयाप्रमाणे झालेली कार्यवाही कार्य मूल्यांकन अहवाल लिहताना विचारात घेण्यात यावी.
७. वार्षिक कृती आराखडयाबाबत त्या वर्षीच्या मध्यावधीत (सप्टेंबर/ऑक्टोबर) आढावा घेण्यात यावा व आढाव्या अंती त्यामध्ये काही सुधारणा करावयाची असल्यास ती करण्यात यावी तथापि सदरची कार्यवाही कोणत्याही परिस्थितीत ३१ ऑक्टोंबर पर्यंत पुर्ण करण्यात यावी.

८. प्रतिवेदन अधिका-याने स्वाक्षरी केलेली वार्षिक कृती आराखडयाची एक प्रत मुख्य वनसंरक्षक व त्यावरील अधिका-यांनी शासनास तर इतर भावसे अधिका-यांनी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबलप्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सादर करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०६०३१३१८५११८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar D Tarange

Digitally signed by Chandrashekhar D Tarange
DN: CN = Chandrashekhar D Tarange, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue & Forest
Date: 2015.06.03 13:19:32 +05'30'

**(चंद्रशेखर तरंगे)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत:-**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान मुख्य वन संरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. व्यवस्थापकीय संचालक, वनविकास महामंडळ, नागपूर
८. प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे
९. प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. प्रधान मुख्य वन संरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
११. प्रधान मुख्य वन संरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक
१३.सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उपवनसंरक्षक/विभागीय वनअधिकारी व सहाय्यक वनसंरक्षक पदावर कार्यरत असलेले भारतीय वनसेवेतील अधिकारी
१४.सर्व महाव्यवस्थापक/विभागीय व्यवस्थापक, वनविकास महामंडळ, मर्या.
१५.सर्व उपमहासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त
१६.सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१७. सहसचिव/उपसचिव/विशेष कार्य अधिकारी (फ-१), महसूल व वन विभाग (वन कक्षातील)
१८. निवडनस्ती, कार्यासन/फ-७